अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात प्रमाणपत्र सादर न करु शकलेल्या अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट-ब (राजपत्रित), गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील विविध संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांकरिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०१९/प्र.क्र.१२९/का.१४२६**
**६ वा माळा, विस्तार इमारत,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२५**

**संदर्भ** :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३०.०६.२०२०
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०१९/प्र.क्र.१२९/का.१४२६, दि.०३.०९.२०२०.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयांनुसार देण्यात आलेल्या सूचनांनुसार नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या कार्यालयाकरीता गट-ब (राजपत्रित), गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील विविध संवर्गातील एकूण २२ अधिकारी/कर्मचारी यांचेकरीता संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय दि.०३.०९.२०२० अन्वये शासन निर्णयाच्या दिनांकापासून अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत.

तथापी, श्री.संतोष बुगे, सांख्यिकी सहाय्यक यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविल्याच्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालयात दाखल केलेले न्यायालयीन प्रकरण (रिट याचिका क्र. ५३१८/२०२४) व प्रस्तुत प्रकरणी, सामान्य प्रशासन विभागाच्या अभिप्रायांनुसार, नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील दि.०३.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयाअन्वये अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा दि.३१.१२.२०१९ पासून पूर्वलक्षी प्रभावाने अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट-ब (राजपत्रित), गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील विविध संवर्गातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या, तथापि जात प्रमाणपत्र सादर न करु शकलेल्या २२ अधिकारी/कर्मचारी यांचेसाठी संदर्भ क्र. ३ येथील नियोजन विभागाच्या शासन निर्णय दि.३.०९.२०२० नुसार २२ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात

आली आहे. सदर २२ अधिकारी/कर्मचारी यांची संवर्गनिहाय माहिती सदर शासन निर्णयाच्या सहपत्र अ,ब व क मध्ये दर्शविण्यात आली आहे. सदर आदेशासोबतच्या “सहपत्र ब” व “सहपत्र क” मधील कर्मचाऱ्यांच्या संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९ सोबत जोडलेल्या “परिशिष्ट क” व “परिशिष्ट ड” मधील नमुन्यानुसार *दिनांक ३१.१२.२०१९ पासून पूर्वलक्षी प्रभावाने* ११ महिन्यांकरीता किंवा ते पुढील ११ महिन्यांपेक्षा कमी काळ सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, अधिसंख्य पदावर नियुक्ती आदेश तात्काळ निर्गमित करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

२. नियोजन विभागाच्या शासन निर्णय दि.०३.०९.२०२० मधील इतर सर्व तरतूदी जशाच्या तशा लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, अनौ.संदर्भ क्र.१९७/आर-२, दि.१८.१०.२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०२१७१५२५५१३४१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2025.02.17 15:27:18 +05'30'

**(चारूशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव,
५. महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
७. महालेखापाल-२(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
८. महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
९. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
१०. सचिव, सामान्य प्रशासन विभाग (आरक्षण-२), मंत्रालय,

११. प्रधान सचिव (वित्त विभाग), मंत्रालय,

१२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

१३. सह संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, नवी मुंबई/नाशिक/ पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,

१४. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,

१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालये,

१६. कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (का.१४२७),

१७. निवडनस्ती (का.१४२६).